राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना आढावा व संनियंत्रण पथक स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आरपीए-२०२३/प्र.क्र.१७/र-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २४.०७.२०२४.

**वाचा :- १.** शासन निर्णय क्र आरपीए-२०१७/ प्र.क्र. २५८/र-१, दि. ०९.१०.२०२३

**प्रस्तावना :-**

भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ अंतर्गत महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना संनियंत्रण समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीला सहाय्य करण्यासाठी व समितीचे कामकाज हाताळण्याकरीता शासन स्तरावर आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागांतर्गत सह/उपसचिव (पुनर्वसन) यांचे पर्यवेक्षणाखाली, राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना आढावा व संनियंत्रण पथक स्थापन करण्यास व सदर पथकाकरीता आवश्यक पदे निर्मिती व वाहन खरेदीबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना संनियंत्रण समितीला सहाय्य करण्यासाठी व समितीचे कामकाज हाताळण्याकरीता शासन स्तरावर आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागांतर्गत सह/उपसचिव (पुनर्वसन) यांचे पर्यवेक्षणाखाली, राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना आढावा व संनियंत्रण पथक स्थापन करण्यास व सदर पथकास आवश्यक पदे निर्मिती व वाहन खरेदीबाबतच्या प्रस्तावास राज्य मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार शासन निर्णय खालीलप्रमाणे घेत आहे :-

**राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना आढावा व संनियंत्रण पथकाची रचना खालीलप्रमाणे राहील**

**(अ) नियमित पदे-**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या |
|---|---|---|
| १ | अवर सचिव- पथक प्रमुख (मंत्रालयीन संवर्ग) | १ |
| २ | उपजिल्हाधिकारी (प्रतिनियुक्तीने) (भूसंपादन व पुनर्वसन विषयक कामकाज किमान ३ वर्षे हाताळण्याचा अनुभव आवश्यक ) | १ |
| ३ | सहायक कक्ष अधिकारी (मंत्रालयीन संवर्ग) | १ |
| | **एकूण** | ३ |

**ब) कंत्राटी बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा-**

| अ.क्र. | सेवा | पद संख्या |
|---|---|---|
| १ | पुनर्वसन व पुनर्स्थापना विषयक तज्ञ | १ |
| २ | विधि सल्लागार (भूसंपादन व पुनर्वसन विषयक न्यायालयीन कामकाज किमान ३ वर्षे हाताळण्याचा अनुभव आवश्यक) | १ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | २ |
| ४ | वाहनचालक | १ |
| | **एकूण मनुष्यबळ** | ५ |

(एक) पुनर्वसन व पुनर्स्थापना विषयक योजना/आराखडा यांच्या अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण यासंबंधी महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना संनियंत्रण समितीने दिलेल्या निर्देशानुसार व सोपविलेली कामे सदर पथकाने करावयाची आहेत.

(दोन) सदर पथकास वाहन अनुज्ञेय करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिका-यास अनुज्ञेय असलेले वाहन खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(तीन) सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर, राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना आढावा व संनियंत्रण पथक कार्यान्वित करण्यासाठी व वाहन खरेदीसाठी आवश्यक असणारा निधी उपलब्ध करण्याची कार्यवाही शासन स्तरावर करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत आहे. त्याचा संकेतांक २०२४०७२५११०३३२६२१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2024.07.25 11:17:45 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री ( वित्त) यांचे खाजगी सचिव
४) मा. उप मुख्यमंत्री ( जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
५) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा. राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
७) सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) सर्व जिल्हाधिकारी, सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी (पुनर्वसन)
१३) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
१४) सर्व कार्यासने (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय. मुंबई.